सन २०१९-२० मध्ये राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे ही योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - २०१९/प्र.क्र.८७/३अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०८ नोव्हेंबर, २०१९

वाचा-

१) **शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. शेविदौ - ४२०७/प्र.क्र. १४५/३अे, दि. ६ .६. २००७**
२) **शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. शेविदौ - ४२११/प्र.क्र. ३८/३अे, दि. ९.३.२०११**
३) **शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस - २०१४/प्र.क्र. ८२/भाग-३/ उद्योग-४, दि. ३०.१०.२०१५**
४) **कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र. शेमासे /१९-२० / प्र.क्र.०३ / शेविअदौ / मासू /विप्र-६/३६५,दि. ३ .६.२०१९**

प्रस्तावना-

राज्यातील शेतकऱ्यांना विविध प्रगत देशातील विकसीत आणि आधुनिक तंत्रज्ञानाची माहिती होण्यासाठी तसेच शेतमालाची निर्यात / कृषि मालाचे पणन व बाजारपेठेतील मागणी, कृषि माल प्रक्रिया याबरोबरच त्या देशांमध्ये उपयोगात येत असलेले अद्ययावत तंत्रज्ञान अवगत करुन त्याचा वापर राज्यातील शेतकऱ्यांनी त्यांच्या शेतावर/शेतीमध्ये करण्यासाठी सहाय्य करणे, विविध देशांनी विकसीत शेती तंत्रज्ञान व अनुषंगिक बाबी यांची माहिती त्या देशातील शेतकऱ्यांशी प्रत्यक्ष चर्चा करुन तसेच क्षेत्रिय भेटी, संबंधित संस्थांना भेटी इत्यादीद्वारे शेतकऱ्यांचे ज्ञान आणि क्षमता उंचावण्याकरीता कृषि विभागाकडून राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे आयोजित करण्यात येतात. तदनुसार सन २००४-२००५ पासून सदर योजना सुरु आहे.

सन २०१९-२० मध्ये राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे योजना राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढील निर्णय घेत आहे.

शासन निर्णय-

१ सन २०१९-२० मध्ये राज्यातील शेतकऱ्यांचे देशाबाहेर अभ्यास दौरे ही योजना राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२ शासनाने विहित केलेल्या तरतुदीनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी व त्यानुषंगाने सदर योजना सन २०१९-२० मध्ये राबविण्याकरिता मार्गदर्शक सुचना आयुक्त (कृषि) यांनी निर्गमीत कराव्यात.

३ सदर योजना राबविण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) तथा राज्य नोडल अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०८१५४६२८७७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.11.08 15:47:51 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि) , कृषि आयुक्तालय,पुणे
५) संचालक ( विस्तार व प्रशिक्षण ) तथा राज्य नोडल अधिकारी कृषि आयुक्तालय,पुणे
६) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११) सर्व तालुका कृषि अधिकारी,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१४) वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
१५) नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
१६) कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (कार्यासन-३अे).